**मा. मंत्री (ग्रामविकास) व मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांच्या कार्यालयासाठी, सचिव (मुमंग्रासयो) यांचेकरिता तसेच या विभागासाठी संगणक व त्याअनुषंगिक इतर साहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-५५२५/प्र.क्र. ०२/मातंक**

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: १३ फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :**

ई-ऑफिस प्रणाली राबविण्यासाठी तसेच डिजीटायजेशनला प्रोत्साहन देण्यासाठी मा. मंत्री (ग्रामविकास) व मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांच्या कार्यालयासाठी, सचिव (मुमंग्रासयो) यांचेकरिता तसेच या विभागासाठी मोठी स्क्रीन असलेले संगणक, कलर प्रिंटर, साधे प्रिंटर (छोटे) (Single Function), प्रिंटर (Multifunction), स्कॅनर्स, संगणक (२४ इंच), Wi-Fi करिता राऊटर्स व लॅपटॉप हे साहित्य खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

मा. मंत्री (ग्रामविकास) व मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांच्या कार्यालयासाठी, सचिव (मुमंग्रासयो) यांचेकरिता तसेच या विभागासाठी खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार संगणक व त्याअनुषंगिक इतर साहित्य खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | साहित्याचे नाव | एकूण नग |
|---|---|---|
| १) | मोठी स्क्रीन असलेले संगणक | १६ |
| २) | कलर प्रिंटर | ०५ |
| ३) | साधे प्रिंटर(छोटे) (Single Function) | ०६ |

| | | |
|---|---|---|
| ४) | प्रिंटर (Multifunction) | २० |
| ५) | स्कॅनर्स | ३० |
| ६) | संगणक | २० |
| ७) | Wi-Fi करिता राऊटर्स | १७ |
| ८) | सचिव (मुमंग्रासयो) यांचेकरिता लॅपटॉप | १ |

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग ३/उद्योग-४, दि.१/१२/२०१६ ( शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका ) मधील नियमानुसार तसेच सदर विभागाच्या दि.२४/०८/२०१७ व ०७/०३/२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील सुधारित प्रक्रिया अवलंबुन सदर खरेदी करण्यात यावी.

३) उपरोक्त साहित्याची खरेदी करण्यास दि. २९.०१.२०२५ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये मान्यता प्राप्त झाली आहे. तसेच उपरोक्त सर्व साहित्यांचे Specifications माहिती तंत्रज्ञान विभागाकडुन निश्चित करून घेण्यात आले आहेत.

४) यासाठीचा खर्च "मागणी क्रमांक एल-४, ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा-(०१)(०३)- ई गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी १७ संगणक खर्च-(३४५१ २८०८) मागणी क्रमांक एल-४ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशिर्षातंर्गत सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध झालेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५) वरीलप्रमाणे साहित्य खरेदी करण्यात आल्यावर सर्व साहित्याची नोंद नोंदणी व भांडार शाखेने जडवस्तु संग्रहात घ्यावी.

६) सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये सुधारित केल्यानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ सोबतच्या परिशिष्टातील भाग पहिला, उप विभाग दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक-७६ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१३१३२७५२६९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.02.13 13:28:55 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
३. उप सचिव (मातंक), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
४. उप सचिव (नोंदणी व भांडार शाखा), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
५. कक्ष अधिकारी (नोंदणी व भांडार शाखा), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
६. प्रधान सचिव (ग्रामविकास) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
७. निवड नस्ती (का.माहिती तंत्रज्ञान कक्ष), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई